**बृहन्मुंबई महानगरपालिकेस प्राथमिक शिक्षणावरील खर्चासाठी वेतन अनुदानाची प्रतिपूर्ती करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : बृमपा-२०२३/प्र.क्र.१०४/एसएम-४,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : ०१ जून, २०२३.

<u>वाचा</u> :- १) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१५/प्र.क्र.१४२/एसएम-४, दिनांक ७ जुलै, २०१५,

२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन शुध्दीपत्र क्र. संकीर्ण-२०१५/प्र.क्र. १४२/एसएम-४ दिनांक ७ जुलै, २०१६,

३) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. बृमपा-२०२०/प्र.क्र.०१/एसएम-४, दिनांक २९ मार्च, २०२३

**<u>प्रस्तावना:-</u>**

महानगरपालिका व नगरपालिकांना प्राथमिक शिक्षणावरील खर्चासाठी शालेय शिक्षण विभागामार्फत देण्यात येणा-या अनुदानाबाबत दि. १६/१२/१९८७ च्या शासन निर्णयात सुधारणा करून संदर्भाधीन क्र. (१) येथील शासन निर्णय, दि. ७ जुलै २०१५ अन्वये सुधारीत आदेश निर्गमित करण्यात आले आहे. या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अनुदान सूत्रानुसार राज्यातील महानगरपालिका/नगरपालिका/नगरपरिषद/ कटक मंडळे यांना प्राथमिक शिक्षणाच्या मान्य बाबींवरील खर्चाची प्रतिपूर्ती राज्य शासनाद्वारे अनुज्ञेय आहे.

२. बृहन्मुंबई महानगरपालिकेने सादर केलेल्या प्रस्तावाची विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई विभाग, मुंबई यांच्यास्तरावरुन तपासणी करण्यात आली असून तपासणीअंती अनुज्ञेय अनुदानाची रक्कम निर्धारीत करण्यात आली आहे.

३. बृहन्मुंबई महानगरपालिकेस प्राथमिक शिक्षणावरील खर्चासाठी शिफारस केल्यानुसार सन २०१८-१९, २०१९-२०, २०२०-२१, २०२१-२२ व सन २०२२-२३ या आर्थिक वर्षातील पहिल्या, दुसऱ्या व तिसऱ्या हप्त्यापोटी वेतन अनुदानाची प्रतिपूर्ती म्हणून एकूण रु. १९१,९८,९५,३७०/- (रूपये एकशे एक्याण्णव कोटी अठ्ठयाण्णव लाख पंच्याण्णव हजार तीनशे सत्तर फक्त ) इतकी रक्कम अनुज्ञेय आहे. तसेच, यापूर्वीच्या कालावधीसाठी खाजगी प्राथमिक शाळांचे अनुज्ञेय वेतन अनुदानाची प्रतिपूर्ती व प्रत्यक्षात देण्यात आलेल्या रक्कमेतील तफावत असलेल्या थकीत अनुदानाची प्रतिपूर्ती

एकूण रक्कम रु.५,६३,२०,३७९/- ( रुपये पाच कोटी त्रेसष्ट लाख वीस हजार तीनशे एकोणऐंशी फक्त ) अनुज्ञेय आहे. याप्रमाणे सन २०१८-१९ ते २०२२-२३ मधील पहिल्या, दुसऱ्या व तिसऱ्या हप्त्यापोटी अनुज्ञेय वेतन अनुदान व मागील काही वर्षासाठीचे थकीत वेतन अनुदान असे एकूण रु.१९७,६२,१५,७४९/- ( रुपये एकशे सत्याण्णव कोटी बासष्ट लाख पंधरा हजार सातशे एकोणपन्नास फक्त ) इतकी रक्कम वेतन अनुदानाची प्रतिपूर्ती म्हणून मंजूर करावयाची होती. त्यापैकी संदर्भ क्र. (३) येथील शासन निर्णय, दि. २९.०३.२०२३ अन्वये रु. ३४,२२,४०,०००/- इतकी रक्कम वेतन अनुदान म्हणून बृहन्मुंबई महानगरपालिकेस मंजूर व अदा करण्यात आलेली आहे. चालू आर्थिक वर्षात या प्रयोजनासाठी उपलब्ध असलेल्या निधीतून वेतन अनुदानाची थकबाकी मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

बृहन्मुंबई महानगरपालिकेस प्राथमिक शिक्षणावरील खर्चासाठी शिफारस केल्यानुसार सन २०१८-१९ ते सन २०२२-२३ मधील पहिल्या, दुसऱ्या व तिसऱ्या हप्त्यापोटी अनुज्ञेय वेतन अनुदान व मागील काही वर्षासाठीचे थकीत वेतन अनुदान असे एकूण रु. १९७,६२,१५,७४९/- ( रुपये एकशे सत्याण्णव कोटी बासष्ट लाख पंधरा हजार सातशे एकोणपन्नास फक्त ) इतकी रक्कम अनुज्ञेय होती.

त्यापैकी संदर्भ क्र. (३) येथील शासन निर्णय, दि. २९.०३.२०२३ अन्वये रु. ३४,२२,४०,०००/- इतकी रक्कम वेतन अनुदान म्हणून बृहन्मुंबई महानगरपालिकेस मंजूर व अदा करण्यात आलेली आहे. त्यामुळे बृहन्मुंबई महानगरपालिकेस रु.१६३,३९,७५,७४९/- इतकी वेतन थकबाकी अदा करावयाची शिल्लक आहे.

आर्थिक वर्ष २०२३-२४ करीता बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या प्राथमिक शिक्षणावरील खर्च भागविण्याच्या प्रयोजनासाठी लेखाशिर्ष (२२०२ ०१९१) ३६-सहायक अनुदाने (वेतन) अंतर्गत रु. ३७,६४,६४,०००/- ( रुपये सदतीस कोटी चौसष्ट लाख चौसष्ट हजार फक्त ) इतकी तरतूद मंजूर आहे.

२. त्यानुसार बृहन्मुंबई महानगरपालिकेस प्राथमिक शिक्षणावरील खर्चासाठी रुपये ७,५२,९२,८००/- ( रुपये सात कोटी बावण्ण लाख ब्याण्णव हजार आठशे फक्त ) इतके वेतन अनुदान म्हणून "मागणी क्र. ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण ०१ प्राथमिक शिक्षण, १९१ स्थानिक संस्थांना सहाय्य (०१) इतर स्थानिक संस्थाना अर्थसहाय्य (०१) (०१) मुंबई महानगरपालिकेस अनुदान (अनिवार्य) (२२०२ ०१९१) ३६-सहायक अनुदाने (वेतन)" या लेखाशीर्षा अंतर्गत सन २०२३-२४ च्या मंजूर तरतूदीतून अदा करण्यास याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

३. सदर खर्चासाठी शिक्षण उपसंचालक, मुंबई विभाग, मुंबई यांना "आहरण व संवितरण अधिकारी" तसेच, आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४६२/व्यय-५, दि.२३.०५.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०६०११५३९३७२९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAMOD VITHOBA KADAM

Digitally signed by PRAMOD VITHOBA KADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=f82b9e0b005ed06987e1ae26683203c8f241022e0aad6b1c827af561b72f83bb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF4901BED6A4BEE0ED963C63F1B0172A4718894A400C0988FBB3381DB913696F, cn=PRAMOD VITHOBA KADAM
Date: 2023.06.01 15:40:25 +05'30'

**( प्रमोद कदम )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव.
३) मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव
४) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
६) प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
८) आयुक्त (शिक्षण), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
९) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे,
१०) विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई विभाग, मुंबई.
११) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१२) महालेखापाल (लेखापरिक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१३) शिक्षणाधिकारी, बृहन्मुंबई महानगरपालिका शिक्षण विभाग, करी रोड (पूर्व), मुंबई
१४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१५) स्थानिक निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१६) शालेय शिक्षण व क्रीडा विभागातील सर्व कार्यासने
१७) निवड नस्ती, एसएम-४.